बेलोरा, जि.अमरावती विमानतळावरील अनुषंगिक कामे व शिर्डी विमानतळाची विकासकामे याकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या., मुंबई यांना सहायक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मविवि १३१४/प्र.क्र.१९०/२८-अ,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

तारीख: ३० मार्च, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः क्र. मविवि २०१३/ प्र.क्र.१७७/२८-अ, दि.२८/०२/२०१४.

२) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या.,यांचे अशा पत्र क्रमांक मविविकं/लेखा/अनुदान/२०१४/११९१, दिनांक २९/१०/२०१४.

३) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या.,यांचे अशा पत्र क्रमांक मविविकं/शिर्डी/O&M/२००२, दिनांक ११/०३/२०१५.

प्रस्तावना -

मौजे काकडी-शिर्डी येथील विमानतळावरील पहिल्या टप्प्यातील उर्वरित विकासकामे करण्याकरिता व अमरावती विमानतळावरील अनुषंगिक विकासकामे करण्याकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये निधी वितरणाचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्या संचालक मंडळाच्या दि.२४/०२/२०१५ रोजी झालेल्या ४९ व्या बैठकीत शिर्डी येथील विमानतळ सुरु करण्याच्या अनुषंगाने विमानतळ परवाना प्राप्त करुन घेण्यासाठी आवश्यक असलेल्या सुविधांची कामे तातडीने पुर्ण करण्यात यावीत व त्यासाठी आवश्यक असलेला निधी उपलब्ध करुन देण्यात यावा असे निर्देश मा. मुख्यमंत्री महोदयांनी दिले आहेत. त्यानुसार कंपनीने शिर्डी विमानतळाकरिता रु. ५० कोटी (अक्षरी रु. पन्नास कोटी फक्त) निधी वितरीत करण्याची विनंती संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये केली होती.

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये बेलोरा, जि. अमरावती येथील विमानतळ भारतीय विमानपत्तन प्राधिकरणास हस्तांतरीत करावयाचा निर्णय मंत्रीमंडळाच्या मान्यतेने घेण्यात आला आहे. तथापि, सदर शासन निर्णयानुसार बेलोरा विमानतळावरील वीज पुरवठा, पाणीपुरवठा आदी अनुषंगिक विकासकामे राज्य शासनाच्या वतीने महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने करावयाची आहेत. त्याकरिता रु. ३४.०० कोटी (अक्षरी रु.चौतीस कोटी फक्त) इतक्या खर्चास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाव्दारे

मान्यता देण्यात आली आहे. याप्रकरणी सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात रु. १४.०० कोटी (अक्षरी रु.चौदा कोटी फक्त) वितरीत करण्यात आले आहेत. सदर विकासकामांकरिता निधी वितरणाची विनंती महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये केली होती.

**शासन निर्णय-**

२. शिर्डी येथील विमानतळ सुरु करण्याच्या अनुषंगाने विमानतळ परवाना प्राप्त करुन घेण्यासाठी आवश्यक असलेल्या सुविधांची कामे तातडीने पुर्ण करण्याकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस रु. ५०.०० कोटी (अक्षरी रु. पन्नास कोटी फक्त) वितरीत करण्याकरिता शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच बेलोरा, जि. अमरावती विमानतळावरील अनुषंगिक विकासकामे करण्याकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस रु. १९.३० कोटी (अक्षरी रु. एकोणीस कोटी तीस लक्ष फक्त) वितरीत करण्याकरिता शासनाची मान्यता देण्यात येत आहे;

३. वरीलप्रमाणे चालू आर्थिक वर्षी एकूण रू.६९.३० कोटी (अक्षरी रु. एकोणसत्तर कोटी तीस लक्ष) सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांना अदा करण्यासाठी उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर एकूण रू.६९.३० कोटी सहाय्यक अनुदान खर्चाचा अहवाल शासन आणि महालेखापाल यांना सादर करावा.

४. या प्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च सन २०१४-१५ च्या आर्थिक वर्षाच्या अंदाज पत्रकामध्ये खालील लेखाशिर्षा अंतर्गत मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्रमांक ए-७,

३०५३- नागरी विमानचालन, (०२) विमानतळे,

१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, राज्ययोजना

(००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहाय्यक अनुदान (३०५३०१६४),

३१ — सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)”

६. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं ११०४/१४/व्यय-४, दि.०९/१२/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०३३०१४४७००६२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2015.03.30 16:03:29 +05'30'

**( समीर सावंत )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.

२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई.

३. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादीत,मुंबई

४. संचालक/ उपसंचालक, विमानचालन संचालनालय, हँगर क्रमांक ६, जुहू विमानतळ,मुंबई

५. महालेखापाल (लेखा वअनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई .

६. महालेखापाल (लेखा वअनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

८.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

९. जिल्हाधिकारी, अमरावती.

१०.जिल्हाधिकारी, अहमदनगर.

११. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, ( कार्यासन २५) ,मंत्रालय,मुंबई

१२. निवड नस्ती.

**प्रत माहितीसाठी**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३. अपर मुख्य सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई